**प्रधानमंत्री कुसूम घटक "ब" योजनेतंर्गत अनुसूचित जाती लाभार्थ्यांसाठी राज्य शासन हिस्स्यापोटी रु.५०.८४७८८ कोटी इतके अनुदान महाऊर्जा यांना रोखीने वितरीत करणेबाबत. (मागणी क्र.एन-३, लेखाशीर्ष क्र.२८१००९९२)**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग**
**शासन निर्णय, क्रमांक:पुरक-२०२४/प्र.क्र.१३१/ऊर्जा-७**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०००३२.
दिनांक: ३१ मार्च, २०२५.

**वाचा :-**

१. शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्र.सौरप्र-२०१९/प्र.क्र.२६८/ऊर्जा-७, दि.१२.०५.२०२१.
२. शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्र.सौरप्र-२०२२/प्र.क्र.२९५/ऊर्जा-७, दि. ०९.०१.२०२३.
३. शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग, क्र.सौरप्र-२०२२/प्र.क्र.२९५/ऊर्जा-७, दिनांक ०५.०३.२०२४.
४. शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.३४/अर्थ-३, दिनांक ०१.०४.२०२४.
५. शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दि.२५.०७.२०२४ व दि.१७.०३.२०२४.
६. शासन निर्णय, उ.ऊ.का.व खनिकर्म विभाग, क्र.बीयुडी-२०२३/प्र.क्र.३७४/ऊर्जा-७, दि.२८.०८.२०२४.
७. महाऊर्जा कार्यालयाचे पत्र क्र.लेखा/बीपी-०३४/सौरऊर्जा कृषिपंप (कुसूम-ब)/२०२४-२५/१२९९, दिनांक २७.१२.२०२४.
८. शासन निर्णय, सा.न्या.व वि.सहाय्य विभाग, क्र.बीजीटी-२०२४/प्र.क्र.३९/अर्थसंकल्प, दि.०७.०३.२०२५.
९. शासन निर्णय, उ.ऊ.का.व खनिकर्म विभाग, क्र.पुरक-२०२४/प्र.क्र.१३१/ऊर्जा-७, दि.१७.०३.२०२५.
१०. शासन निर्णय, सा.न्या.व वि.सहाय्य विभाग, क्र.बीजीटी-२०२४/प्र.क्र.३९/अर्थसंकल्प, दि.३१.०३.२०२५.

**प्रस्तावना:**

"राज्यातील कृषीपंप वीज जोडण्यांचे सौर ऊर्जेद्वारे विद्युतीकरण करण्याचे अभियान" संदर्भाधिन क्र.१ येथील शासन निर्णयान्वये जाहिर करण्यात आले असून, या अभियानातील कुसूम घटक "ब" अंतर्गत दरवर्षी एक लाख नग याप्रमाणे पुढील ५ वर्षामध्ये ५ लाख सौर कृषीपंप आस्थापित करण्यात येणार आहेत. सदर योजनेची अंमलबजावणी महावितरण कंपनी व महाऊर्जा कार्यालयामार्फत करण्यात येत आहे. महाऊर्जा कार्यालयाकडून अनुसूचित जाती लाभार्थ्यांसाठी आतापर्यंत एकूण १५,४८७ सौर कृषीपंप आस्थापित करण्यात आलेले आहेत. सदर आस्थापित पंपांसाठी एकूण रु.२१३.०७९४ कोटी इतका निधी आवश्यक आहे. त्यापैकी, रु.८०.०० कोटी इतका निधी यापूर्वीच्या आर्थिक वर्षांमध्ये महाऊर्जा कार्यालयास उपलब्ध करुन देण्यात आलेला आहे. उर्वरित रु.१३३.०७९४ कोटी इतका निधी महाऊर्जा कार्यालयास वितरीत करणे बाकी आहे. सदर निधी उपलब्ध करुन देण्यासाठी निधी मागणीचा प्रस्ताव महाऊर्जा कार्यालयाने संदर्भाधिन क्र.७ येथील पत्रान्वये शासनास सादर केला आहे. सन २०२४-२५ या वित्तीय वर्षाकरीता मागणी क्रमांक एन-३, लेखाशीर्ष क्र.२८१००९९२ खाली अनुसूचित जाती लाभार्थ्यांसाठी शासन हिस्स्यापोटी (विशेष घटक योजनेतंर्गत) रु.४४४.०६८४ कोटी इतकी सुधारीत तरतूद मंजूर करण्यात आली आहे. सदर तरतूदीमधून कुसूम घटक "ब" योजनेतंर्गत अनुसूचित जाती लाभार्थ्यांसाठी महाऊर्जा कार्यालयास रु.५०.०० कोटी इतका राज्य शासन हिस्सा संदर्भाधिन क्र.९ येथील शासन निर्णयान्वये वितरीत करण्यास मान्यता देण्यात आली आहे. आता, प्रधानमंत्री कुसूम घटक "ब" अंतर्गत अनुसूचित जाती लाभार्थ्यांसाठी राज्य शासनाच्या हिस्स्यापोटी सामाजिक न्याय व

विशेष सहाय्य विभागाने विशेष घटक योजनेतंर्गत मागणी क्र.एन-३, लेखाशीर्ष क्र.२८१००९९२ खाली रु.१८०.८४७८८ कोटी इतका निधी प्रशासकीय विभाग प्रमुख म्हणून अपर मुख्य सचिव (ऊर्जा), उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग यांना बीम्स प्रणालीवर संदर्भाधिन क्र.१० येथील शासन निर्णयान्वये उपलब्ध करून दिला आहे. विभागास उपलब्ध करुन देण्यात आलेल्या सदर रकमेमधून रु.५०.८४७८८ कोटी इतका निधी बीम्स प्रणालीद्वारे नियंत्रक अधिकाऱ्यांमार्फत महासंचालक, महाराष्ट्र ऊर्जा विकास अभिकरण, पुणे यांना वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

प्रधानमंत्री किसान ऊर्जा सुरक्षा एवंम उत्थान महाभियान (कुसूम) या अभियानाच्या घटक "ब" अंतर्गत महाऊर्जाकडून अनुसूचित जाती लाभार्थ्यांसाठी आस्थापित करण्यात आलेल्या सौर कृषीपंपांकरीता सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाने संदर्भाधिन क्र.१० येथील शासन निर्णयान्वये या विभागास उपलब्ध करुन दिलेल्या रकमेमधून रु.५०.८४७८८ कोटी (रुपये पन्नास कोटी चौऱ्याऐंशी लाख अठ्याहत्तर हजार आठशे फक्त) इतका निधी अर्थसंकल्पिय निधी वितरण प्रणालीद्वारे नियंत्रक अधिकाऱ्यांमार्फत महासंचालक, महाराष्ट्र ऊर्जा विकास अभिकरण, पुणे यांना वितरीत करण्यास याद्वारे शासन मंजूरी देण्यात येत आहे.

२. सदर रक्कम अदा करण्यासाठी श्री.नारायण श्री.कराड, सह सचिव (ऊर्जा), उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग, मंत्रालय, मुंबई यांना नियंत्रक अधिकारी व श्रीम.अंकिता बोऱ्हाडे, कार्यासन अधिकारी, उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग, मंत्रालय, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

३. सदर निधी महासंचालक, महाराष्ट्र ऊर्जा विकास अभिकरण, पुणे (Director General, Maharashtra Energy Development Agency, Pune) यांच्या नावे अदा करण्यात यावा.

४. प्रधानमंत्री कुसूम घटक "ब" योजनेवरील खर्चाची उद्दिष्टे व प्रत्यक्ष साध्यता याबाबतच्या माहितीसह मासिक व त्रैमासिक अहवाल लगतच्या महिन्याच्या १० तारखेपर्यंत महाऊर्जा कार्यालयाने शासनास सादर करावा. या शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आलेला निधी केवळ या योजनेतील घटक "ब" अंतर्गत अनुसूचित जाती लाभार्थ्यांच्या सौर कृषी पंपाकरीता सन २०२४-२५ या आर्थिक वर्षासाठी खर्च करण्यात येईल, याची खातरजमा करण्यात यावी. विहित कालावधीत सदर निधी कोणत्याही परिस्थितीत खर्च न होता महाऊर्जाकडे पडून राहिल्यास त्याची संबंधितांवर जबाबदारी निश्चित करावी. मान्य व अनुज्ञेय काळात खर्च करण्याची जबाबदारी महासंचालक, महाऊर्जा यांची राहील. याबाबतचा त्रैमासिक अहवाल न चुकता सादर करण्याची जबाबदारी लेखाविषयक बाबी हाताळणाऱ्या सहायक/उप संचालक (लेखा) म्हणून कार्यभार पाहणाऱ्या अधिकाऱ्यांवर टाकण्यात यावी.

५. सदर निधीच्या लेख्यासंबंधीची कागदपत्रे, महाऊर्जा कार्यालयाने आवश्यक तेव्हा महालेखापाल, मुंबई, महाराष्ट्र-१ यांच्याकडे तपासणीसाठी सादर करावीत.

६. याबाबतचा खर्च "मागणी क्र. एन-३, मुख्य लेखाशीर्ष – २८१०, नवीन व नवीकरणीय ऊर्जा, ००, ७८९, अनुसूचित जातींसाठी विशेष घटक योजना, (०१) अनुसूचित जाती घटक कार्यक्रमांतर्गत योजना, (०१)(०१) मुख्यमंत्री सौर कृषी पंप योजना (कार्यक्रम), ३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) (२८१००९९२)" या लेखाशीर्षाखाली सन २०२४-२५ या आर्थिक वर्षासाठी मंजूर सुधारीत अर्थसंकल्पिय तरतूदीमधून भागविण्यात यावा. या लेखाशीर्षाखाली निधी वितरीत करण्यासाठी सादर करण्यात येणाऱ्या देयकाच्या अनुषंगाने प्रमाणित

करण्यात येते की, सदर देयक सशर्त असून या लेखाशीर्षाखाली कोणतेही संक्षिप्त देयक प्रलंबित नाही. तसेच, उपयोगिता प्रमाणपत्र प्रलंबित नाही.

७. सन २०२४-२५ या आर्थिक वर्षासाठी महासंचालक, महाऊर्जा, पुणे यांना निधी वितरीत करताना शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. अर्थसं-२०२४/प्र.क्र.३४/अर्थ-३, दिनांक ०१.०४.२०२४ मधील आवश्यक त्या सूचना व अटींचे पालन करून तसेच, शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३,दिनांक २५.०७.२०२४ व दिनांक १७.०३.२०२५ मधील तरतूदींनुसार आणि वित्त विभागाच्या अनौ.संदर्भ क्र.१९६/व्यय-१४, दिनांक २८.०२.२०२५ नुसार सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाने निर्गमित केलेल्या शासन निर्णय, क्र.बीजीटी-२०२४/प्र.क्र.३९/अर्थसंकल्प, दिनांक ३१.०३.२०२५ नुसार सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०३३१२१०५५१३६१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PRADIP DATTATRAY BHINTADE

Digitally signed by PRADIP DATTATRAY BHINTADE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRIES ENERGY LABOUR AND MINING DEPARTMENT, 2.5.4.20=148166d6ba6b6b7506a6c02726418297ae7252d6770d6eeda6fcf82676c59eb5, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=70AB5B7C0DEE32FCEE54C2D940368CB9D34A7AEDC3404176B7D9B0082921CFF0, cn=PRADIP DATTATRAY BHINTADE
Date: 2025.03.31 21:06:35 +05'30'

**(प्रदिप भिंताडे)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई,
२. मा.सभापती/मा.अध्यक्ष, महाराष्ट्र विधानपरिषद/विधानसभा यांचे सचिव, मुंबई,
३. मा.उप सभापती/मा.उपाध्यक्ष, महाराष्ट्र विधानपरिषद/विधानसभा यांचे सचिव, मुंबई,
४. मा.मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,
५. मा.उप मुख्यमंत्री (नगरविकास व गृहनिर्माण), महाराष्ट्र राज्य यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई,
६. मा.उप मुख्यमंत्री (वित्त व नियोजन), महाराष्ट्र राज्य यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई,
७. मा.विरोधी पक्षनेते, विधानपरिषद/विधानसभा, विधानभवन, मुंबई,
८. मा.मंत्री (अपारंपरिक ऊर्जा) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
९. मा.राज्यमंत्री (ऊर्जा) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
१०. सर्व मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
११. सर्व विधानपरिषद/विधानसभा सदस्य, विधानभवन, मुंबई,
१२. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई,
१३. अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
१४. अपर मुख्य सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई,
१५. अपर मुख्य सचिव (ऊर्जा), उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग, मंत्रालय, मुंबई,
१६. प्रधान सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई,
१७. सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव यांचे स्वीय सहायक, सर्व मंत्रालयीन विभाग, मुंबई,
१८. महालेखापाल, महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर,
१९. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
२०. अध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत मंडळ सूत्रधारी कंपनी मर्या.,मुंबई,
२१. अध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य वीज वितरण कंपनी मर्या.,मुंबई,
२२. अध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य वीज निर्मिती कंपनी मर्या.,मुंबई,
२३. अध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य वीज पारेषण कंपनी मर्या.,मुंबई,
२४. महासंचालक, महाराष्ट्र ऊर्जा विकास अभिकरण (महाऊर्जा), पुणे,
२५. सह सचिव (ऊर्जा-७/३), उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग, मंत्रालय, मुंबई,
२६. ऊर्जा उप विभागातील सर्व कार्यासने,उद्योग,ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग, मंत्रालय, मुंबई,
२७. निवड नस्ती/ऊर्जा-७.